सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात डॉ. बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठास ३५-भांडवली मत्तेच्या निर्मीतीकरीता अनुदान वितरीत करण्याबाबत....

# महाराष्ट्र शासन

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : कोकृवि-११२२/प्र. क्र.११/७-अे,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : १५ मार्च, २०२२.

**वाचा :-** १) वित्त विभागाचे परिपत्रक क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.०६.०४.२०२१, दि.२४.०६.२०२१ व दि.१४.१०.२०२१.

२) नियंत्रक, डॉ. बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली यांचे पत्र क्र. डॉबासाकोकृवि/लेखा-२/११७०/२०२२, दि.१४.०१.२०२२.

**प्रस्तावना:-**

वित्त विभागाच्या दि.१४.१०.२०२१ च्या शासन निर्णयान्वये सन २०२१-२२ मधील कार्यक्रमखर्चासाठी अर्थसंकल्पीत निधीच्या ५०% इतक्या मर्यादेत निधी वितरणास मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार नियंत्रक, डॉ. बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली यांनी उपरोक्त संदर्भ क्र. २ अन्वये निधी वितरणाचा प्रस्ताव सादर केलेला आहे. यास्तव निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरिता, डॉ. बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली, यांना '२४१५ कृषि विषयक संशोधन व शिक्षण' या मुख्य लेखाशीर्षाखाली '०१ पीक संवर्धन', २४१५ ००८१, या लेखाशीर्षांतर्गत **३५-भांडवली मत्तेच्या निर्मीतीकरीता अनुदान** या बाबीकरीता मंजूर अर्थसंकल्पीय तरतुदीच्या ५० टक्के प्रमाणात खालीलप्रमाणे एकुण रु. ६,८३,००,००० /- (अक्षरी रुपये सहा कोटी त्र्याऐंशी लाख फक्त) एवढे अनुदान वितरीत करण्यास शासन मंजुरी देत आहे. याबाबतचा सविस्तर तपशिल पुढीलप्रमाणे दर्शविण्यात आला आहे.

(रु.लाखात)

| अ. क्र. | योजना व उद्दीष्ट | तपशीलवार विवरण | शासन निर्णय क्रमांक व दिनांक | विद्यापीठाकडून अनुदान मागणी | विभागाकडून वितरीत करावयाचे अनुदान |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ७ |
| १ | डॉ. बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठाला सहायक अनुदान (कार्यक्रम) २४१५ ००८१ ३५- भांडवली मत्तेच्या निर्मीतीकरीता अनुदान | काढणी पश्चात व्यवस्थापन पदव्युत्तर संस्था, रोहा, रायगड | शा.नि.क्र.कोकृवि २०१०/प्र.क्र.६२/७-अे दि. ६.०८.२०१० | ५८.०० | ५८.०० |
| २ | | मत्स्य अभियांत्रिकी विषयातील पदविका अभ्यासक्रम, शिरगाव,जि. रत्नागिरी | शा.नि.क्र.कोकृवि २०१०/प्र.क्र.१०१/ ७-अे दि. ६.०८.२०१० | ७५.०० | ७५.०० |
| ३ | | उद्यानविद्या महाविद्यालय, मुळदे | शा.नि.क्र.कोकृवि २०११/४३४/प्र.क्र. ९८/७-अे दि. ०३.०१.२०१२ | ३५०.०० | ३५०.०० |
| ४ | | सागरी जीवशास्त्रीय संशोधन केंद्र, पेठकिल्ला, रत्नागिरी करीता नवीन प्रशासकीय इमारत बांधणे | शा.नि.क्र.कोकृवि १११५/प्र.क्र.१०६/ ८-अे दि. ०३.०७.२०१७ | २००.०० | २००.०० |
| | | **एकूण-** | | **६८३.००** | **६८३.००** |

२. सदर शासन निर्णयातील अनुदान हे खालील नमूद अटी व शर्तीच्या अधिन राहून वितरीत करण्यात येत आहे.

१) कृषि विद्यापीठांनी योजना आणि बाबनिहाय वितरीत केलेला निधी संबंधीत योजनेतील अनुज्ञेय बाबींसाठीच फक्त खर्च करावा.

२) वितरीत केलेला निधी कोणत्याही कारणास्तव अखर्चित / शिल्लक राहीला / राहणार असेल तर सदर अखर्चित / शिल्लक निधी शासनाचे मान्यतेशिवाय इतर गटांसाठी / योजनांसाठी / बाबींसाठी परस्पर वर्ग करु नये किंवा खर्च करु नये.

३) ज्या योजनांतर्गत योजनांचा कालावधी संपलेला आहे, अशा योजना संबंधित कालावधीनंतर शासनाची मान्यता मिळाल्याशिवाय योजनांतर्गत खर्चाने पुढे चालू ठेऊ नयेत.

४) महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषदेने, कृषि विद्यापीठांना मंजूर केलेले सहाय्यक अनुदान, अनुदान सुत्राप्रमाणे बरोबर आहे किंवा कसे, तसेच विहीत आदेश / कार्यपध्दतीनुसार खर्च करण्यात येत आहे किंवा कसे, याबाबत प्रत्येक आर्थिक वर्षाचा मुल्यमापन अहवाल शासनास संबंधित आर्थिक वर्ष समाप्त झाल्यापासून तीन महिन्यांच्या कालावधीत सादर करावा. तसेच, मागील आर्थिक वर्षाचा अखर्चित निधी किती आहे हे तात्काळ शासनास कळवावे.

५) कृषि विद्यापीठांना त्यांचे महसूली उत्पन्न वापरण्यास शासनाने मान्यता दिलेली आहे. याबाबत विद्यापीठाने विहीत आदेश आणि कार्यपध्दतीनुसार उचित कार्यवाही करावी. तसेच महसूली उत्पन्न वाढविण्याच्या योजना राबविण्याबाबत कार्यवाही करावी.

६) विद्यापीठांना मंजूर करण्यात आलेले अनुदान महाराष्ट्र कृषि विद्यापीठ अधिनियम १९८३, महाराष्ट्र कृषि विद्यापीठ परिनियम १९९०, आणि महाराष्ट्र कृषि विद्यापीठ लेखा संहिता १९९१ मधील तरतूदीप्रमाणे आणि प्रचलित शासन आदेश व विहित कार्यपध्दतीनुसार सक्षम अधिका-यांची प्रशासकीय व वित्तीय मान्यता घेतल्यानंतर विहीत मर्यादेत खर्च करण्यात यावे. केवळ अर्थसंकल्पीय तरतूद आहे किंवा अनुदान वितरीत केले आहे म्हणून खर्च करु नये.

विद्यापीठाच्या नियंत्रक आणि इतर संबंधित सक्षम प्राधिका-यांनी उपरोक्त अटी व शर्तींचे काटेकोरपणे अनुपालन करावे.

३. या प्रित्यर्थचा खर्च सन २०२१-२२ च्या अंदाजपत्रकात नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली मंजूर केलेल्या तरतूदीतून मासिक निधी विवरणपत्राच्या मर्यादेत भागवावा व त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

४. उपविभागीय कृषि अधिकारी, दापोली, या आहरण व संवितरण अधिकारी यांनी संबंधित उपशीर्षांतर्गत मंजूर केलेले अनुदान शासन निर्णय क्रमांक कृषि व सहकार विभाग क्रमांक अेजीयु-१०७२/ १८४७१/व्ही, दिनांक २७ सप्टेंबर १९७२ आणि शासन निर्णय क्रमांक कृषिवि- २००३/सीआर-३५/२०-अे, दिनांक २५/४/२००३ मध्ये नमूद केल्याप्रमाणे कृषि विद्यापीठांचे संबंधित नियंत्रक यांना अदा करण्याबाबत आवश्यक कार्यवाही करावी.

५. हे आदेश महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका (भाग-१) १९७७ मधील परिच्छेद १४२ व १४४ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या शक्तीनुसार तसेच वित्त विभागाचा शासन निर्णय क्रमांक अर्थसं-२०२१/ प्रक्र.४८/अर्थ-३ दि.१४.१०.२०२१ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२२०३१५१४५७५३९१०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VARSHA M MEHER

Digitally signed by VARSHA M MEHER
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=15c7ee448037873e9a798068206bca7a76131bdca6b4660721edcffa24f13d02, pseudonym=DF028EC074B9701EF79AA9C9DDE9252E3743EE7A, serialNumber=32E5D5F3AC71BC2B5E34B484CA757B21FC3E12CE30CAE2D0F913FE77E2B06737, cn=VARSHA M MEHER
Date: 2022.03.15 15:00:48 +05'30'

**(वर्षा मेहेर)**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१. सदस्य सचिव तथा महासंचालक / सल्लागार (वित्त), महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे,
२. कुलगुरु / कुलसचिव / नियंत्रक, डॉ. बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली,
३. उपविभागीय कृषि अधिकारी, दापोली,

४. महालेखापाल, महाराष्ट्र १ / २ (लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर,
५. जिल्हा कोषागार अधिकारी, रत्नागिरी / उपकोषागार अधिकारी, दापोली,
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई,
७. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,
८. उप मुख्य लेखा परिक्षक (वरिष्ठ), स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,
९. कक्ष अधिकारी, वित्त विभाग (व्यय-१ / अर्थसंकल्प - १३), मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
१०.कक्ष अधिकारी, नियोजन विभाग १४३१), मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
११.कक्ष अधिकारी /अवर सचिव, कार्यासन २अे / ६अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
१२.कार्यासन ७-अे (निवडनस्ती), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.